छत्रपती संभाजीनगर विभागातील नायब तहसिलदार या संवर्गातील तदर्थ पदोन्नत्या पुढे सुरु ठेवण्याबाबत (निवडसूची सन २०२२-२३).

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदोन्न -२०२४/प्र.क्र. ५७/ई-९**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३१ जुलै, २०२४.

**वाचा :-**

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र. २०२४ /मशाका /२/आस्था/रा-२/प्र.क्र./कावि-२१३, दि.१४.०३.२०२४ व दि.१६.०४.२०२४
२) महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. पदोन्न-२०२३/प्र.क्र.१६९/ई-९, दि.१०.११.२०२३

**शासन आदेश:-**

उक्त वाचा-२ येथील आदेशान्वये छत्रपती संभाजीनगर विभागातील अव्वल कारकून संवर्गातील ८ व मंडळ अधिकारी संवर्गातील ३ अशा एकूण ११ कर्मचाऱ्यांना सन २०२२-२३ या निवडसुची वर्षात तदर्थ पदोन्नत्या देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर ११ तदर्थ पदोन्नती देण्यात आलेल्या नायब तहसीलदारांपैकी ८ नायब तहसीलदार (अ.का. ६ + मं.अ.२) हे सन २०२३-२४ च्या निवडसूचीमध्ये नियमित होत असून अव्वल कारकून संवर्गातील २ नायब तहसिलदार ज्येष्ठतेनुसार व अन्य कारणास्तव नियमित पदोन्नतीस पात्र नसल्याने त्यांची तदर्थ पदोन्नती पुढे सुरु ठेवण्यात येत आहे.

**अव्वल कारकून (२) -**

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **४** | **५** |
| १ | २३९६ | श्री. म. अ. मोईज म. अ. अजीम | खुला |
| २ | २५७१ | श्री. पठाण एस. ए. | खुला |

२. उपरोक्त नायब तहसिलदारांची तदर्थ पदोन्नती खालील अटींच्या अधीन पुढे सुरु ठेवण्यात येत आहे:-

१) निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.
२) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.७.५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दिनांक ७ मे,२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

३. सदरची तदर्थ पदोन्नती सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने पुढे सुरु ठेवण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७३११७३८११८७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.07.31 17:53:03 +05'30'

**( श्रीकांत म. मोहिते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६. जिल्हाधिकारी, छ. संभाजीनगर, जालना, बीड, परभणी, लातुर, हिंगोली, धाराशिव, नांदेड.
७. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपुर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, छ. संभाजीनगर, जालना, बीड, परभणी, लातुर, हिंगोली, धाराशिव, नांदेड
९. संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, छ. संभाजीनगर विभाग, छ. संभाजीनगर यांच्यामार्फत).
१०. निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.